**मोटार वाहन विभागातील नवनियुक्त सहायक मोटार वाहन निरीक्षक यांच्या सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ रोड ट्रान्सपोर्ट (सीआयआरटी), पुणे येथे होणा-या ५६ दिवसीय प्रशिक्षणास व त्यापोटी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१११९/प्र.क्र.२५०/परि-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १८ नोव्हेंबर २०१९

वाचा : -

**परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.पआका/का-१३/प्रशिक्षण-१४/२०१९/ जा.क्र.१५३३३, दि.३१.१०.२०१९**

**प्रस्तावना :-**

मोटार वाहन विभागातील नवनियुक्त ८३२ सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांना महाराष्ट्रातील विविध प्रशिक्षण संस्थांमध्ये दोन वर्षाचे प्रशिक्षण आणि कार्यानुभव देण्याचे प्रस्तावित आहे.त्यानुषंगाने सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ रोड ट्रान्सपोर्ट (सीआयआरटी), पुणे येथे प्रत्येकी १०० प्रशिक्षणार्थीच्या तीन व १३२ प्रशिक्षणार्थींची एक अशा एकुण चार तुकड्यांमध्ये एकुण ४३२ सहायक मोटार वाहन निरीक्षक यांना आठ आठवड्यांचे (५६ दिवस) प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्यापैकी पहिल्या तुकडीतील १०० सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांच्या आठ आठवड्यांच्या (५६ दिवस) प्रशिक्षणास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार वाहन विभागातील नवनियुक्त ८३२ सहाय्यक मोटार वाहन निरीक्षकांपैकी पहिल्या तुकडीतील १०० सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांच्या दि.२२.११.२०१९ ते १६.०१.२०२० या कालावधीत सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ रोड ट्रान्सपोर्ट (सीआयआरटी), पुणे येथे घेण्यात येणा-या प्रशिक्षणास व त्यासाठी प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिन रु.३३००/- या प्रमाणे १०० अधिका-यांचे ५६ दिवसांसाठी = रु. ३३०० प्रतिदिन X १०० प्रशिक्षणार्थी X ५६ दिवस = रु.१,८४,८०,०००/- (अक्षरी एक कोटी चौ-याऐंशी लक्ष ऐंशी हजार फक्त) (जीएसटीसह) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनांवरील कर,(०१)(०२) मोटार वाहन विभागातील अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण, (कार्यक्रम) (२०४१ ०३४१) १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थीक वर्षाकरीता केलेल्या तरतुदींमधून भागविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-पहिला उप विभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ व महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका मधील परिच्छेद २७(२) अ) नुसार असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११८१२४४१८७८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2019.11.18 12:48:39 +05'30'

**(द.ह. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/प्रशासन/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती- (परि-४).